**शासकीय आदिवासी आश्रमशाळांमधील अपघाती मृत्यू होणाऱ्या विद्यार्थी/विद्यार्थीनींच्या पालकांना अनुकंपा म्हणून देण्यात येणाऱ्या सानुग्रह अनुदानाच्या रकमेत वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआशा-२०१६/प्र.क्र.२०२/का.१३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ जून, २०१८

**वाचा:-** (१) समाजकल्याण व क्रिडा विभाग, एएससी-१०८१/५६९५६/का.१५, दि.२४.०२.१९८२.
(२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.एएससी-१०९१/२८२७१/(१९४५)/का.१३, दि.२३.०३.१९९२.
(३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२०१०/प्र.क्र.९४/का.१३, दि.२५.०८.२०११.
(४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२०१६/प्र.क्र.२०२/का.१३, दि.३०.०६.२०१६.

**प्रस्तावना :-**

वाचा येथील संदर्भ क्र.१ येथील नमूद समाज कल्याण व क्रिडा विभाग, शासन निर्णय, दि.२४.०२.१९८२ अन्वये शासकीय आदिवासी आश्रमशाळांमध्ये विद्यार्थी/विद्यार्थ्यांनीच्या नैसर्गिक आपत्ती वा अपघाती मृत्यू प्रकरणी त्यांच्या पालकांना अनुकंपा म्हणून रु.५,०००/- सानुग्रह अनुदान म्हणून मंजूर करण्यांत येत होते. परंतु सदर अनुदान कमी असल्याने वाचा येथे नमूद संदर्भ क्र.२ आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, दि.२३.०३.१९९२ अन्वये सदर अनुदानात वाढ करुन अनुकंपाची रक्कम रु.१५,०००/- इतकी करण्यांत आली. सदर अनुदानाच्या रकमेतही शासनाने पुन्हा वाचा येथे नमूद संदर्भ क्र.३ आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, दि.२५.०८.२०११ अन्वये वाढ करुन अनुकंपाची रक्कम रु.७५,०००/- इतकी केली आहे. सद्य:स्थितीत आश्रमशाळांमधील नैसर्गिक आपत्ती वा अपघाती मृत्यू पावलेल्या विद्यार्थी/विद्यार्थीनींच्या सानुग्रह अनुदान म्हणून अनुकंपाची रु.७५,०००/इतकी रक्कम दिली जाते. सदर सानुग्रह अनुदानाच्या रकमेत सुधारणा होऊन सुमारे ७ वर्षाचा कालावधी लोटला आहे. त्यामुळे सदर सानुग्रहाची रक्कम आजची परिस्थिती पाहता अतिशय कमी आहे. सदर रक्कम कमी असल्याबाबत लोकप्रतिनिधींनी वेळोवेळी वाढ करण्याची मागणी केली आहे. तसेच विधानमंडळाच्या अधिवेशना दरम्यान बऱ्याचदा याविषयी चर्चा होवून सदर रक्कम अतिशय कमी असल्याने त्यात वाढ करण्याची मागणी सदस्यांनी केली आहे. त्यामुळे सदर सानुग्रहाच्या रकमेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, शासकीय आदिवासी आश्रमशाळेत, अनुदानित आश्रमशाळेत व नामांकित शाळेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थी/विद्यार्थीनींचा आश्रमशाळेत शिक्षण घेत

असताना त्याचा/तिचा नैसर्गिक आपत्ती वा अपघाती वा आटोक्याबाहेरील कारणांमुळे मृत्यू झाल्यास मृत विद्यार्थी/विद्यार्थीनींच्या पालकास रु.२,००,०००/- (रुपये दोन लक्ष फक्त) इतके सानुग्रह अनुदान मंजूर करण्यांत यावे. अनुदानित आश्रमशाळा व नामांकित शाळांमधील विद्यार्थ्याचे ५०% अनुदान शासनाकडून व ५० % अनुदान संबंधित संस्थेकडून देय राहील. सदर आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

२. या कारणांकरीता होणारा खर्च उपरोक्त वाचा येथील नमूद संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयातील नमूद तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी अशा घटना त्यांच्या निदर्शनास येताच तात्काळ योग्य ती चौकशी/शहानिशा करुन संबंधित मृत विद्यार्थी/विद्यार्थीनीच्या पालकास सानुग्रह अनुदानाची रक्कम मृत्यू घडलेल्या तारखेपासून १५ दिवसांच्या आत अदा करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१३०२०५१२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.06.19 13:01:02 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव ( आदिवासी विकास विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकआदिवासी विकास प्रकल्प.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई.
९. महालेखापाल (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
१०.सर्व निवासी लेखा परिक्षा अधिकारी.
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२.सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.